राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत कंपोनंट सी करिता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पाच्या बँक खात्यात जमा करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)
(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)
शासन निर्णय क्रमांक - आव्यप्र-२०२२/प्र. क्र.३७/आव्यप्र-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - १५.०३.२०२२.

वाचा-राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, भारत सरकार यांचे आदेश क्रमांक F. No. ४-१/२०१५-PMU (Vol IV)/६६० दि. २८.०१.२०२२.

प्रस्तावना -

राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प राज्याच्या किनारी जिल्ह्यात राबविण्यात येत आहे. या साठी केंद्र शासन, जागतिक बँक, महाराष्ट्र शासन यांच्यात दिनांक - ११.०८.२०१५ रोजी करार करण्यात आला आहे. राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, भारत सरकार ह्यांच्यात दि. २८.०१.२०२२ च्या आदेशान्वये प्रकल्पांतर्गत कंपोनंट सी करीता २०२१-२२ करीता रु. ३,२८,००,०००/- (तीन कोटी अठ्ठावीस लाख फक्त) एवढा निधी राज्यास वितरीत करण्यात आला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाला आहे.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित निधी रु. १ कोटी पैकी रु. ५० लक्ष तरतूद वित्त विभागाने वितरीत केली आहे. सदर निधी कोषागारातून आहरीत करून राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पासाठी उघडण्यात आलेल्या बँक खात्यात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत केंद्र शासनाकडून कंपोनंट सी करीता सन २०२१-२२ करिता राज्यास प्राप्त झालेल्या ५०,००,०००/- (पन्नास लाख फक्त) एवढा निधी आहरीत करून राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पासाठी उघडण्यात आलेल्या बँक खात्यात जमा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पासाठी उघडण्यात आलेल्या बँक खात्याचा तपशील -

| | |
|---|---|
| बँक | स्टेट बँक ऑफ इंडिया |
| खाते नंबर | ३९२२०२७०१४९ |
| IFSC नंबर | SBIN०००४२८३ |
| शाखा | पी.बी.बी. चर्चगेट, मुंबई |

सदर निधी आहरित करण्यासाठी लेखाधिकारी, आणि वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या कामी होणारा मागणी क्रमांक सी-६, २२४५ २६१२ धोके प्रवणता व्यवस्थापनासाठी तांत्रिक सहाय्य (०७)(०१) (१०० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने २२४५ २६१२ या लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ करिता करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनोपचारीक संदर्भ क्रमांक २२/अर्थोपाय दि. ०४.०३.२०२२ अनन्व्ये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०२२०३१५१३०३०४०४१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(के. सुर्यकृष्णमूर्ती)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

०१. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
०२. महालेखाकार, महाराष्ट्र -१, मुंबई
०३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
०४. वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापकन, मंत्रालय, मुंबई
०५. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग , मंत्रालय, मुंबई
०६. अर्थसंकल्प शाखा, ब-१ , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
०७. निवड नस्ती